# बालांगण

## डॉ. नीलेश जोशी

प्रकाशक:

eBook Publication Pvt. Ltd.®

4/47, उदय को. हौ. सोसायटी,

आरे रोड, गोरेगाव पश्चिम,

मुंबई, महाराष्ट्र, भारत, ४०००६२

Telephone: +91 7038164022

Email: publicationebook@gmail.com

प्रथमावृत्ती: **६ एप्रिल २०१९**



मुखपृष्ठ:

Razzel Design

Graphic & Website Designer

M: +91-9773699050

www.razzeldesign.com

www.facebook.com/RazzelDesign

# eBook Terms & Conditions

## 1. This eBook* may be

a. Distributed without modification or sale.

b. Copied for personal and educational use.

c. Printed for personal and educational use.

## 2. This eBook* may NOT be

a. Sold individually or as part of package.

b. Modified in any way.

c. Reversed-engineered.



*eBook refers to this PDF and any of its content including pages and images in either electronic or printed form.

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

श्री. नीलेश जोशी गेली कित्येक वर्ष माझ्या संपर्कात आहेत. ते एक उत्तम लेखक आणि गंभीर कवी आहेत. तसेच, गंभीर काव्याबरोबर ते रसाळ बालकाव्य पण करतात. आम्हा कविमित्रांना जेव्हा जेव्हा मोकळा वेळ भेटायचा तेव्हा तेव्हा आम्ही काव्यवाचन करायचो. मी माझ्या साध्या-सुध्या कविता वाचून दाखवून त्यांचा अभिप्राय घ्यायचो आणि ते आपल्या स्वरचित कविता वाचून आम्हा सगळ्या काव्यरसिकांना बेधुंद करून सोडायचे. त्यांची एक एक कविता खूपच सुंदर आणि आक्रमक असायची. त्यांचं गंभीर काव्य अतुलनीय तर असायचंच पण त्यांचं बालकाव्य अप्रतिम असायचं.

आज त्यांच्या त्याच बालकविता या **बालांगणा**त उगवताना, खिदळताना मला दिसतात आणि या '**बालांगण**' नामक काव्यसंग्रहाच्या माध्यमातून त्यांच्या लेखणीतील **बालांगण** आपल्यातील बालमनाला जागृत करतील असे मला वाटते. खरं सांगायचं झालं तर –

**बालकविता लिहिणं एवढं साधं नसतं**
**त्या लिहिताना स्वतः बालक बनावं लागतं**
**स्वतःच्या बाल अनुभवातून गुजरावं लागतं**
**आणि मुख्यतः स्वतः बालपण जगावं लागतं**

**'बालांगण'** या काव्यसंग्रहातून असं दिसून येतं की या बालकविमनाने निश्चितच आपलं बालपण बरंच अनुभवलं आणि तसंच जगलं पण असेल. या **बालांगणा**बद्धल मी असं अनुभवलं की -

**बालांगण आहे हे अनेक पात्रांचे,**
**शब्दांच्या ओळीचे**
**बालांगण आहे हे आपल्या ताईचे,**
**गोऱ्यापान माळीचे**

**बालांगणात आहे ती गणिती तलवार,**
**बालमनावर करे गणिती वार**
**बालांगणात आहे उंदीरदादा,**
**मनी मावशीचा फेटाळे तो इरादा**

**बालांगणात आहे एक ससा छान,**
**मुखवटेकार म्हणून आहे त्याला मान**
**बालांगणात येतो एक लबाड कोल्हा,**
**घालून फिरे तो सिंहेरी मुखवटा**

**बालांगणात लिहिले एका डासाने मृत्युपत्र,**
**पत्रात लिही त्याचे जीवन चरित्र**
**बालांगणात करे डास गुणगुण फार,**
**निशाणी देऊन घेई रक्ताचे थेंब चार**

**बालांगणात घडे प्राण्या-माणसांची बोली,**
**शिकारी मांजराची इथे गंमत झाली**
**बालांगणात आहे वाघाची मावशी,**
**उंदीर बघुनी म्याव म्याव करते बघा कशी**

**बालांगणात मांडतो खेळ भातुकलीचा,**
**मन्या चिंगीच्या कल्पित संसाराचा**
**बालांगणात जशी सुट्टी लागली,**
**खेळायला असे कुरळ्या केसांची बाहुली**

हे **बालांगण** लहान मुलांसाठी असल्याकारणाने त्यांना ते जरूर आवडेल पण मोठ-मोठ्या काव्यरसिकांना पण हे भुरळ घालेल. या कवीची शब्दावली, शब्दसाहित्य, शब्दरचना, शब्दसंपदा अतुलनीय आहे. त्यांच्याकडे जणू शब्दभांडारच वसलेला आहे. एवढ्या साध्या साध्या कविता ते कठीण कठीण शब्दांनी लिहितात आणि सगळीच अक्षरं अचूक जुळवितात. तसेच, त्यांची कल्पनादृष्टी तेजस्वी आहे. सामान्य सामान्य गोष्टीत काव्य शोधून ते मोठ्या सहजतेने लिहितात.

असे हे **बालांगण**, या बालकविमनाने सुंदर पद्धतीने मांडले आहे. मला खात्री आहे की हे **बालांगण** आपल्यातल्या बालपणाला, बालमनाला निश्चितच जागवेल आणि बालरसिकांना जरूर आवडेल.

**- हनुबाब,** गोवा
havhanubab@gmail.com

# मनोगत

**आधी नमन तुज गणराया**

**विघ्ननाशक ओंकार मोरया ||**

**मग विद्यादात्री सरस्वतीचे**

**अखंड समर्थ शब्दब्रह्माचे ||**

**सुसफल होवो बालांगण हे**

**हेचि एक निरंतर मागणे ||**

**बालांगण** हा माझा पहिलाच काव्यसंग्रह. या संग्रहात फक्त ११ बालकविता आहेत. या कवितामधील **ताई** ही माझी पहिला कविता असून ३० डिसेंबर १९९९ रोजी लिहिली. आणि गंमत अशी की १६ सप्टेंबर २००१ रोजी दै. ऐक्य सातारा जिल्ह्याचे मुखपत्र समजल्या जाणाऱ्या दैनिकातून प्रकाशित झाली. अशाच प्रमाणे यातील बऱ्याच कविता मी पुढे दै. ऐक्यमधून प्रकाशित केल्या. त्या सर्व कवितांचा एक संग्रह **बालांगण**च्या रूपाने पुन्हा एकदा सर्वांसाठी खुला करीत आहे.

यात **ताई** आहे, मन्या-चिंगी आहे त्यांची **भातुकली** आहे, तर कुणाची लाडकी असणारी **बाहुली** आहे, येथे **उंदीरदादा** तर आहेतच शिवाय **वाघाची मावशी** सुद्धा आहे. दंगा मस्ती मौज मज्जा पण एकदा का शाळेला **सुट्टी लागली** की हे सगळे भेटीला येतात. हे लक्षात ठेऊन

हा बालप्रपंच मांडला आहे. निश्चित हा आबालवृद्धांना खेळवून ठेवेल आणि कुठेतरी ‘बालपणाचा काळ सुखाचा’ याची आठवण करून देईल.

मूळात माझ्या कवितांचा संग्रह प्रकाशित करण्याचा माझा मानस नव्हता, पण माझे मित्र **हनुबाब** बराच काळापासून माझ्यामागे लागले की या बालकविता प्रकाशित कराच आणि अखेरीस **बालांगण** खूले करावे लागले. खरंच मी त्यांचा खूप आभारी आहे. तसेच eBook Publication Pvt. Ltd. मुंबई यांचाही मी ऋणी आहे की ते हे पुस्तक प्रकशित करीत आहेत.

श्री. राम धस याने या पुस्तकाला एक सुंदर मुखपृष्ठ दिल्यामुळे मी त्यांचा आभारी आहे.

**- डॉ. नीलेश जोशी वैशंपायन**
**मुंबई**

# ताई

एक आहे आमची ताई
तिला असते नेहमी घाई

कुणी म्हणा जरा थांब
गाल फुगवून होते लांब

नाकाच्या शेंड्यावर राग फार
मिळे आम्हां तिचा मार

येता आमच्या डोळ्यात पाणी
तिचा राग जाई त्यातून वाहुनी

घेऊनी आम्हां तिच्या जवळी
घट्ट हृदयाशी ती आवळी

येता तिच्या नयनी पाणी
दूर होतो आम्ही तिजपासुनी

देतेस का आम्हां लाडू ?
नाही तर आम्ही तुला सोडू

---------------------------------------------------

# आमचा माळी

माळी आमचा असा छान
दिसतो कसा गोरापान

केर काढताना करतो घाई
जणू समजतो स्वतःला भाई

मैदान आमचे करतो सपाट
धूळ उडवतो मात्र अफाट

लावली त्याने नवी रोपटी
खरी आहे त्याची सचोटी

कामाला आहे चांगला सच्चा
दररोज ओरडतो त्याचा बच्चा

रोपट्याला आलं फुल लहान
वाटे त्याला मी असे महान

अधिकारी होता कधी काळी
आता शोभतो हाडाचा माळी

-----------------------------------

# गणिती तलवार

एकास तीन नि दोनास चार
गणिता लाभली तलवारीची धार ....||धृ.||

गुण उडवी आमचे धाड धाड
तिला नाही कसलीच चाढ
नाही चुकला कधी तिचा वार ....||१||

मास्तर धरुनी आमचा कान
गणितापुढे झुकविती मान
याचा राग येतो आम्हां फार ...||२||

गुणाकार, भागाकार, बेरीज नि वजाबाकी
बनली आमची रोजचीच डोकेदुखी
कुणी कमी करा हा डोईवरला भार ..||३||

पाढे तर फार कठीण भारी
पाठ करता हाता तोंडाची मारामारी
सतत होई आमचा जयजयकार ..||४||

गणिता पडतो तुझ्या आम्ही पाया
कायम राहू दे छत्रछाया
नाहीतर होऊ आम्ही पुरे ठार ...||५||

------------------------------------

# उंदीरदादा

एक होते उंदीरदादा
नव्हता त्यांना नोकरीधंदा ||

अचानक एके दिनी
फुलविक्रेता दिसला कोणी ||

विचार करी तो थोडासा
फुलाचाच धंदा काढू छानसा ||

मग दुकान थाटले रस्त्यावर
बराच नफा मिळवी फुलांवर ||

हळूहळू दुकान त्याचे वाढले
इतर उंदीर नोकर म्हणून आले ||

अशाच एका बाजाराच्या दिवशी
गिऱ्हाईक म्हणून आली मनी मावशी ||

सारे उंदीर लपले फुलात
सापडले होते मोठ्या संकटात ||

उंदरांचा वास येई मनीला
वाटे फुलात आहे उंदीर बसलेला ||

मनीने अगदी जिभल्या चाटत
सारे दुकानच घेतले विकत ||

मनी करणार आता घात
तरी कशी करावी तिजवर मात ||

उंदीरदादांना सुचली एक कल्पना
जाऊन भेटले थेट पोलिसांना ||

रस्त्यावर दुकान थाटले मांजराने
अशी तक्रार केली त्या उंदराने ||

पोलीस दुकानाशी येऊन
मनी मावशीला गेले घेऊन ||

असा हा उंदराचा पिटुकला
होता मोठा मात्र धिटुकला ||

---------------------------------

# मुखवटा

एक होता ससा छान
जंगलात त्याला मोठा मान

मुखवटेकार म्हणुनी प्रसिद्धी खूप
कोणाचाही मुखवटा करी हुबेहूब

एकदा कोल्ह्याच्या आले मनात
सरळ शिरला सशाच्या घरात

सशास म्हणाला

देतो हवा तेवढा तुला पैसा
सिंहाचाच मुखवटा कर जशाच्या तसा

सशाने केला मुखवटा तयार
कोल्ह्याने दिले शंभर दिनार

एवढे पैसे बघून ससा खूष झाला
मुखवटा घेऊन कोल्हा निघून गेला

कोल्हा जंगलात मुखवटा घालून
प्राण्यांना मारू लागला सिंह म्हणून

जंगलात दुसरा सिंह आला कोणी
ही बातमी गेली सिंहाच्या कानी

सिंहाने बोलावली प्राण्यांची सभा
तेथे सिंह होता मधोमध उभा

सभेत निर्णय झाला पक्का
सिंहाने द्यायचा ठरला लढा

दोन्ही सिंह समोर येऊन ठाकले
हत्तीने जोरदार रणशिंग फुंकले

सिंहाने जोराचा एक फटका मारला
अन कोल्ह्याचा मुखवटाच फाटला

असे कोल्ह्याचे पितळ उघडे पडले
ते जंगल सोडून दूर जावे लागले

अशीच मुखवटेधारी माणसं असतात
कोल्हयासारखी कधी तरी उघडी पडतात

म्हणुनी मित्रांनो लक्ष देऊनी ऐका
मुखवट्याविना जगायला शिका

---------------------------------------

## डासाचे मृत्युपत्र

ओढ न मज उरली
या क्षणभंगुर जीवनाची
अनेक वादळात तरुनी
नाव माझी पैलतीरी लागली || १ ||

अनेकांसी जाम चावुनी
जामचावे ही पदवी मिळविली
थेंब थेंब रक्त साठवूनी
ब्लड बँक ही उभारली || २ ||

घाण गल्लीत माझेच मी
साम्राज्य सर्वत्र पसरवले
फुलांच्या सुगंधासम मी
सर्वत्र पाय माझे रोवले || ३ ||

आज माझ्या आयुष्याची
९० वर्षे अशी पूर्ण झाली
माझे मृत्युपत्र करण्याची
कशी वेळ येउनी ठाकली || ४ ||

म्हणुनी मी मच्छरराव जामचावे
घाण गल्लीतले ते घर माझे
करितो हुशार पराक्रमी
थोरल्या मुलाचे नावे || ५ ||

प्रिय माझी मुलगी छकुली
तिजसाठी ठेवली मी ही
ब्लड बँक हि अशी राखुनी
पुढील काळ सुखाचा जावा म्हणुनी || ६ ||

उरलेले माझे सर्व काही
माझ्या पत्नीचेच आहे
तिजवाचुनी मजला दुसरे
अखेरी कोण ते आहे ?

--------------------------------------

## किती करशील गुणगुण

डासा किती करशील गुणगुण
घेण्या रक्ताचे ते थेंब दोन || धृ. ||

गुणगुण करुनी
प्रत्येकाच्या कानी
मी आलो म्हणुनी
देई निशाणी
घेऊनी रक्ताचे ते थेंब दोन || १ ||

पकडावयाला
जाता तयाला
तोच पळाला
समोर बसलेला
वेडावुनी दाखवीत मान || २ ||

-------------------------------------

## अशी गमंत झाली

ही गोष्ट आहे फार फार जुनी
माणसासारखे जेव्हा बोलायचे प्राणी

एक होता छानसा ससुल्यागडी
त्याच्या रोजच्या नव्या भानगडी

एकदा फिरता फिरता त्याला कोणी
दिसला माणूस नावाचा प्राणी

माणूस होता गसच्या फुग्यात बसलेला
निघाला होता उंच आकाशी फिरायला

सशाला वाटे आपणही आकाशी जावे
आकाशातुनी जंगल कसे दिसे ते पहावे

फुग्यातला माणूस येता जमिनीवरी
फुगा घेऊनी ससा गेला सफरीवरी

ससा उंच उंच जाऊ लागे आकाशी
आश्चर्यचकित झाले पाहुनी पशुपक्षी

शिकारी मांजर होते तेथे एक बसलेले
सशाच्या रागाने लाल भडक झालेले

मांजर म्हणे शिकार येई चालुनी दारी
त्वरित धनुष्यबाण आणला कुठून तरी

मांजराने नेम अगदी अचूक साधला
फुगा फुटुनी जमिनीकडे येऊ लागला

फुगा येऊ लागे मांजराच्या दिशेने
ते पाहुनी मांजर पळू लागे जोराने

फुगा कोसळला मांजरावरी येउनी
मांजर मेले फुग्याच्या सिट खाली चेंगरुनी

अशीच अगदी गमंत झाली सारी
मांजराला मिळाली अगदी शिक्षा भारी

म्हणुनी दुसऱ्याचे जो वाईट करू पाहतो
त्याच्याच डाव त्याच्या वरी असा उलटतो

---------------------------------------

# वाघाची मावशी

काळ्या पिवळ्या ठिपक्यांची
शाल सुंदर पाठीवर तिची
ठुमकत ठुमकत चालते कशी
बघा जरा ही वाघाची मावशी || धृ.||

चालताना मागे वळूनी पाही
उंदीर दिसल्याचा भास होई
डोळे मिटुनी होई ऋषीमुनी कुणी
ध्यान चालले उंदराचे मनोमनी
मग हळूच डोळा एक उघडूनी पाहते कशी || १ ||

कुणा ताईची ती लाडकी भारी
दुधाची वाटी तिला सकाळ दुपारी
पोट भरता सुस्त होऊनी जाई
उंच माळावरी निवांत पडुनी राही
पायावरी डोके ठेउनी घेई वामकुक्षी || २ ||

दूध पिऊनि जाताना मागे वळूनी
आपले घारे डोळे हळूच मिटुनी
तोंडाने आर्त मौऊ आवाज काढते
जणू दूध देणाऱ्याचे आभार मानते
तृप्ततेची भावना दिसे नयनी साजेशी || ३ ||

-------------------------------------------

# भातुकली

खेळ मांडीला भातुकलीचा
मन्या चिंगीच्या आवडीचा

मन्या म्हणाला मी बाबा होतो
गाडीतून ऑफिसात जातो

चिंगी म्हणे मी पंजाबी ड्रेस घालेन
अगदी आईसारखी सुंदर दिसेन

छान छान स्वयंपाक करते
तुला ऑफिससाठी डबा देते

पण डब्यासाठी काय करू खाऊ
मन्या म्हणाला पुरणपोळीचा बेत आखू

पुरणपोळ्या करायला घेतल्या
साऱ्या करपून काळ्या झाल्या

भात राही कच्चा जसाच्या तसा
टोमॅटोचा छान झाला मात्र रस्सा

मन्याला ऑफिसला उशीर झाला
म्हणुनी त्याने चिंगीला फटका मारला

तेवढ्यात दारात उभी आई दिसली
चिंगीच्या डोळ्यातून पाण्याची धार लागली

अशी भावंडांची भातुकली फसली
भांडण सोडवता सोडवता आई वैतागली

---------------------------------

# माझी बाहुली

कुरळ्या कुरळ्या केसांची
सुंदर माझी बाहुली कशी
स्वप्नातल्या त्या पऱ्यांची
हुबेहूब ती राणी जशी || धृ. ||

पांढऱ्या पांढऱ्या ढगांच्या
झगमगत्या झग्यावर तिच्या
अलगद हातांनी कोरलेली
नाजूक नक्षी चांदण्यांची || १ ||

निळ्या निळ्या आभाळाची
निळाई ओतली डोळ्यात कुणी
अन रेखीव डोळ्यांच्या कडांवरी
शोभते रेषा काजळाची || २ ||

चमचम करी माणिक मोती
कानातल्या डुलातले
छुनछुन करी पायातली
रुपेरी जोडी पैंजणाची || ३ ||

------------------------------------------

# सुट्टी लागली

शाळा संपली चिंता मिटली
अभ्यासाची कटकट गेली
सुट्टी लागली हो हो सुट्टी लागली || धृ . ||

आता आहे मौज मोठी
आनंदाला नाही ओहोटी
कधी कुणाची जमते गट्टी
कधी कुणाशी कट्टी झाली || १ ||

खेळांची तर चंगळ झाली
सकाळ दुपार नि सायंकाळी
दर दिवशी असेच होई
नव्या दिवसाची नवी खेळी || २ ||

सतत बोलू आम्ही काही
गप्पा गोष्टी कधी गाणी
येता त्यामाजीं रंगत भारी
चढती जाई भेंड्यांची बोली || ३ ||

आता नाही कसलीच भीती
कसली पाटी नि कसली काठी
रोज आमची आहे राजेशाही
शिक्षेला नाही जागा उरली || ४ ||

बालांगण आहे हे अनेक पात्रांचे, शब्दांच्या ओळीचे
बालांगण आहे हे आपल्या ताईचे, गोऱ्यापान माळीचे

बालांगणात आहे ती गणिती तलवार, बालमनावर करे गणिती वार
बालांगणात आहे उंदीरदादा, मनी मावशीचा फेटाळे तो इरादा

बालांगणात आहे एक ससा छान, मुखवटेकार म्हणून आहे त्याला मान
बालांगणात येतो एक लबाड कोल्हा, घालून फिरे तो सिंहेरी मुखवटा

बालांगणात लिहिले एका डासाने मृत्यूपत्र, पत्रात लिही त्याचे जीवन चरित्र
बालांगणात करे डास गुणगुण फार, निशाणी देऊन घेई रक्ताचे थेंब चार

बालांगणात घडे प्राण्या-माणसांची बोली, शिकारी मांजराची इथे गंमत झाली
बालांगणात आहे वाघाची मावशी, उंदीर बघुनी म्याव म्याव करते बघा कशी

बालांगणात मांडतो खेळ भातुकलीचा, मन्या चिंगीच्या कल्पित संसाराचा
बालांगणात जशी सुट्टी लागली, खेळायला असे कुरळ्या केसांची बाहुली

- हनुबाब, गोवा




eBook Publication Pvt. Ltd.®